20110204 20142001 **अकोला शहर एकात्मिक रस्ते विकास योजना**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. अमपा २४०९/प्रक्र २६८ /नवि-२६**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२.**
**दिनांक - ३१ ऑगस्ट, २००९**

प्रस्तावना:-

अकोला शहराचे महत्व व वाढती गर्दी, वाहनांची वाढती संख्या व त्यामुळे सतत होणारी वहातूक कोंडी तसेच अकोला शहराची भविष्यकालीन गरज लक्षात घेऊन वाहतूक व्यवस्थेत मोठ्याप्रमाणात सुधारणा करण्याची आवश्यकता भासत आहे. अकोला शहरासाठी एकात्मिक रस्ते विकास योजना राबविण्याच्यादृष्टीने अकोला महानगरपालिका व महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ यांनी " बांधा, वापरा व हस्तांतरित करावा (B.O.T.) या तत्वावर " अकोला शहर एकात्मिक रस्ते विकास कार्यक्रम " राबविण्यासंबंधी प्रस्ताव तयार केला. या कार्यक्रमाची आर्थिक सुसाध्यता तपासण्यासाठी महाराष्ट्र रस्ते विकास महामंडळ व अकोला महानगरपालिकेतर्फे मे. टेक्नो कन्सलटंट यांची सल्लागार म्हणून नियुक्ती करण्यात आली होती. त्यांनी २००७-०८ च्या दरसूची आणि इतर अनिवार्य शुल्क विचारात घेऊन अकोला शहर एकात्मिक रस्ते विकास योजनेसाठी प्रकल्प तयार केला. या प्रकल्पाच्या पहिल्या टप्प्यात पथकर नाक्याशी संलग्न असलेले, मुख्य बाजार पेठेतील व जास्त वाहतुक वर्दळ असलेल्या ५३ रस्त्यांची सुधारणा करण्याचा व २ नवीन पुल बांधकामाचा समावेश करण्यात आला आहे. अकोला शहरातील एकात्मिक रस्ते विकासाची योजना खाजगी विकसाकामार्फत खुल्या स्पर्धात्मक निविदा मागवून " बांधा वापरा व हस्तांतरित करा " या तत्वावर राबविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. प्रस्तावावर विचारांती शासनाने अकोला शहरातील रस्त्यांच्या एकात्मिक विकासाबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय :-

i) अकोला महानगरपालिका अंतर्गत परिसरात अकोला शहर एकात्मिक रस्ते विकास योजनेंतर्गत सोबतच्या प्रपत्र "अ" मध्ये नमूद केलेल्या ५३ रस्ते व २ पुलांच्या अंदाजे रु. ८५.७६ कोटी किंमतीचा प्रकल्प खाजगीकरणाच्या माध्यमातून " बांधा वापरा व हस्तांतरित करा " (B.O.T.)या तत्वावर राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

ii) हा प्रकल्प राबविण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाला अंमलबजावणी यंत्रणा म्हणून घोषित करण्यात येत आहे. खाजगी विकासकाकडून खुल्या स्पर्धात्मक निविदा मागवून जास्तीत जास्त प्रिमियम देणा-या किंवा कमीत कमी "व्यवहार्यता फरक निधी" मागणा-या उद्योजकामार्फत प्रकल्पातील कामं करण्यात यावीत.

(कृ.मा.प.)

iii) हा प्रकल्प मुंबई मोटार वाहन कर अधिनियम १९५८ मधील कलम-२० नुसार सुनिश्चित क्षेत्रातील एक समूह ( CLUSTER SITUATED IN WELL-DEFINED ZONE ) म्हणून शासनातर्फे मंजूर करण्यात येत आहे.

iv) या प्रकल्पाकरीता संपूर्ण निविदा प्रक्रिया सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत हाताळण्यांत येईल. प्रकल्पात समाविष्ट असलेल्या कामाचे विस्तृत सर्वेक्षण, प्रकल्पास पर्यावरण विषयक "ना हरकत प्रमाणपत्र " आवश्यकतेनुसार मिळविणे, प्रकल्पाचा सुसाध्यता अहवाल तयार करणे , संबंधीत महानगरपालिका व संबंधीत संस्था इत्यादीचा ठराव प्राप्त करुन घेणे, प्रकल्पाची तांत्रिक, वाणिज्यिक व कायदेशीर जोखीम इत्यादी बाबींचा अभ्यास करणे, याबाबी सार्वजनिक बांधकाम विभागाने कराव्यात.

v) निविदा प्रक्रियेतून निश्चित करण्यात येणा-या उद्योजकाकडून प्राप्त होणारी प्रिमियमची रक्कम महानगरपालिकेला देय राहील. मात्र निविदेअंती "व्यवहार्यता फरक निधी" उद्योजकाला द्यावी लागल्यास सदर रक्कम अकोला, महानगरपालिका उपलब्ध करुन देईल. सदर प्रकल्प राबविण्यासाठी आवश्यकतेनुसार भुसंपादन करणे, अतिक्रमणे हटविणे व आवश्यकतेनुसार पुनर्वसनाचा खर्च करणे तसेच प्रकल्पाकरिता अतिक्रमण मुक्त जागा उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी महानगरपालिकेची राहील. तसेच, प्रकल्प राबविण्यासाठी अकोला महानगरपालिका सार्वजनिक बांधकाम विभागास नि:शुल्क सहकार्य करील.

vi) निविदा प्रक्रियेतून निश्चित करण्यात येणा-या उद्योजकास प्रपत्र "ब" मध्ये दर्शविण्यांत आलेल्या ठिकाणी पथकर स्थानके उभारुन सवलतीच्या कालावधीत प्रपत्र "क" मध्ये नमूद केलेल्या दराने प्रपत्र "ड" मधील नमूद करण्यांत आलेल्या सवलती देऊन पथकर वसूल करता येईल. मात्र, उद्योजकास प्रपत्र "इ" मध्ये नमूद करण्यांत आलेला वाहनांना पथकरातून सूट द्यावी लागेल. उद्योजकास सवलतीच्या कालावधीत पथकर वसूल करण्यास अडविले जाणार नाही याची अकोला महानगरपालिकेने खबरदारी घ्यावी

vii) सवलतीच्या कालवधीमध्ये या कामांची देखभाल व दुरुस्तीची जबाबदारी संपूर्णपणे उद्योजकाची असेल. प्रकल्पातील रस्त्यांवर अथवा चौकांवर उद्योजकाकडून प्रकल्पांतर्गत उभारण्यात येणारे विद्युत खांब, हायमास्ट पोली अथवा सिग्नल इ. कामे पूर्ण होऊन त्यांचे प्रत्यक्ष संचालन सुरु झाल्यानंतर त्यावर येणा-या विद्युत देयकांचा भरणा पूर्तता अकोला महानगरपालिकेकडून करण्यात येईल. दोष निवारण कालावधी संपल्यानंतर त्यांच्या देखभाल व दुरुस्तीची संपूर्ण जबाबदारी अकोला महानगरपालिकेची असेल. सवलतीच्या कालावधीत उद्योजकाला करारनाम्यातील अटीनुसार प्रकल्पातील प्रस्तावित रस्त्यांवर उभारलेल्या विद्युत खांबावर व बस थांब्यावर जाहीरात देऊन त्यावरील उत्पन्न घेण्याचे अधिकार अकोला महानगरपालिकेचे असतील. प्रकल्पांतर्गत सुधारणा करण्यात येणा-या रस्त्यांच्या दुतर्फा टाकण्यात येणा-या डक्ट मधुन ऑपटिक फायबर केबल्स टाकण्यात आल्यास त्याच्यापोटी मिळणारे उत्पन्न घेण्याचे अधिकार अकोला महानगरपालिकेस असतील.

viii) सवलतीचा कालावधी पूर्ण झाल्यावर प्रकल्पातर्गत विकसीत करण्यांत आलेल्या अकोला महानगरपालिकेच्या अखत्यारितील रस्ते महानगरपालिकेकडे तर सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारितील रस्ते सार्वजनिक बांधकाम विभागाकडे हस्तांतरित करण्यात येतील. हस्तांतरित करण्याच्या वेळी रस्ते सुस्थितीत राहतील हयाची जबाबदारी उद्योजकाची असेल. तद्नंतर अशा हस्तांतरित करण्यात आलेल्या रस्त्यांची देखभाल व दुरुस्तीची जबाबदारी आप-आपल्या रस्त्यांच्या संदर्भात यथास्थिती महानगरपालिका / सार्वजनिक बांधकाम विभागाची असेल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

( का.तु.सातकर )
महाराष्ट्र शासनाचे उप सचिव

प्रति,
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा. मंत्री ( वित्त व नियोजन ) यांचे खाजगी सचिव
मा. मंत्री ( सार्वजनिक उपक्रम ), सार्वजनिक बांधकाम यांचे खाजगी सचिव
मा. मंत्री (उद्योग ) यांचे खाजगी सचिव
मा. मंत्री ( व्यापार व वाणिज्य) यांचे खाजगी सचिव
विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
जिल्हाधिकारी, अकोला.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई.
आयुक्त, अकोला महानगरपालिका, अकोला
निवडनस्ती, नवि- २६